महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळामार्फत अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ व त्यांच्या ४ घटक संस्था तसेच कोकण मराठी साहित्य परिषद, रत्नागिरी व दक्षिण महाराष्ट्र साहित्य सभा, कोल्हापूर या ७ साहित्य संस्थांना अनुदान मंजूर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**शासन निर्णय क्रमांकः सासंमं-१०१४/प्र.क्र.७४/२०१४/भाषा-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**तारीख : २२ ऑगस्ट, २०१४.**

वाचा :-

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.सासंमं-२००४/प्र.क्र.३००/सां.का.२, दिनांक २३ नोव्हेंबर, २००६.

प्रस्तावना :-

शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.सासंमं-२००४/प्र.क्र.३००/सां.का.२, दिनांक २३ नोव्हेंबर, २००६ अन्वये महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळामार्फत अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ व त्यांच्या ४ घटक संस्था तसेच कोकण मराठी साहित्य परिषद, रत्नागिरी व दक्षिण महाराष्ट्र साहित्य सभा, कोल्हापूर या ७ साहित्य संस्थांना प्रत्येकी **रु.५.०० लक्ष (रुपये पाच लक्ष फक्त)** इतके अनुदान प्रदान करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.मभावा-२०१०/४५८/प्र.क्र.९५(भाग-२)/२०-ब, दिनांक २२ जुलै, २०१० अन्वये स्वतंत्र मराठी भाषा विभागाची स्थापना करण्यात आली असून, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ हे कार्यालय मराठी भाषा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली वर्ग करण्यात आले आहे. सबब दिनांक २३ नोव्हेंबर, २००६ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन नवीन शासन निर्णय निर्गमित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

या शासन निर्णयान्वये अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ व या महामंडळाच्या ४ घटक संस्था म्हणजेच महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे, मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई, विदर्भ साहित्य संघ, नागपूर आणि मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद तसेच कोकण मराठी साहित्य परिषद, रत्नागिरी व दक्षिण महाराष्ट्र साहित्य सभा, कोल्हापूर अशा एकूण ७ साहित्य संस्थांना त्यांचे विविध प्रकारचे वाङमयीन कार्यक्रम, वाङमयीन मुखपत्रे चालविणे, विभागीय साहित्य

संमेलन भरविणे, संदर्भ ग्रंथालय चालविणे, उत्कृष्ट मराठी ग्रंथांना विविध पारितोषिके देणे, संदर्भ ग्रंथ प्रकाशित करणे इत्यादी वाङ्मयीन उपक्रम करुन मराठी भाषा आणि वाङ्मय यांच्या विकासाचे कार्य करण्यासाठी प्रत्येकी **रु.५.०० लक्ष (रुपये पाच लक्ष फक्त)** इतके अनुदान मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रकमेचे धनादेश महामंडळाचे अध्यक्ष व त्या त्या घटक संस्थांच्या, अध्यक्षांच्या नांवे काढण्यात यावेत. यासाठी सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांना कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिका-यास संबंधीत देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. याबाबत होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडएफ-०२, २२०५, कला व संस्कृती (००) १०२, कला व संस्कृती प्रचालन (०१) योजनेतर योजना (०१) (०१) राज्य साहित्य व संस्कृती मंडळ (२२०५ ३१७२) ३१ सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली प्रत्येक आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून मासिक निधी विवरणपत्राप्रमाणे भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्र.खर्चनि-१०.०६/प्र.क्र.१/अर्थोपाय दिनांक २० एप्रिल, २००६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२११७५३५१३९३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dethe Lalita S

Digitally signed by Dethe Lalita S
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MLD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dethe Lalita S
Date: 2014.08.22 12:48:10 +05'30'

( ललिता शि.देठे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
२. महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,

५. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
६. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई (२ प्रती),
७. वित्त विभाग (व्यय -१४ /अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई,

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.राज्यमंत्री (मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. सचिव (मराठी भाषा) यांचे यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. संबंधित साहित्य संस्था - द्वारा - महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
   अ) अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ, पुणे,
   ब) महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे,
   क) मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई,
   ड) विदर्भ साहित्य संघ, नागपूर,
   ढ) मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद,
   ण) कोकण मराठी साहित्य परिषद, रत्नागिरी,
   त) दक्षिण महाराष्ट्र साहित्य सभा, कोल्हापूर,
**५. निवड नस्ती / भाषा-३.**